उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, जळगाव या कार्यालयाकरिता GeM पोर्टलवरुन विद्युत जनित्र (जनरेटर) खरेदी करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०११९/प्र.क्र.१२/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २५ जानेवारी २०१९

वाचा :-

१) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दि.०१.१२.२०१६
२) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र.एमव्हीडी-१०१७/प्र.क्र.२४९/परि-४, दि.१३.१०.२०१७
४) कार्यकारी अभियंता , विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम खाते, नाशिक यांचे प्रपत्र बीजक क्र.१४९८, दि.१०.१०.२०१८
५) परिवहन उप आयुक्त (निरीक्षण), परिवहन आयुक्त कार्यालय,मुंबई यांचे पत्र क्र.पआका /का.१० /सौर बॅटरी खरेदी/२०१८/जा.क्र.७१, दि.०२.०१.२०१९

प्रस्तावना :-

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, जळगाव या कार्यालयातील सोलर यंत्रणेच्या बॅटरीज खराब झाल्यामुळे सदर कार्यालयातील विद्युत पुरवठा खंडीत झाल्यास कार्यालयीन ऑनलाईन कामकाज ठप्प होत असल्यामुळे उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, जळगाव या कार्यालयातील सोलर यंत्रणेच्या ८० नविन बॅटरीज खरेदी करण्यासाठीच्या रु.८,००,०००/- इतक्या खर्चास संदर्भ क्र.३ वरील दि.१३.१०.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, गव्हर्नमेंट ई- मार्केटप्लेस पोर्टलवर या कार्यालयाची नोंदणी न झाल्याने ई-टेंडर वेळेवर करता आलेले नाही, त्यामुळे सोलर यंत्रणेच्या नविन बॅटरीज खरेदी करण्यात आल्या नाहीत व त्यासाठी प्राप्त झालेले अनुदान माहे मार्च २०१८ मध्ये समर्पित करण्यात आले आहे. सबब, उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, जळगाव या कार्यालयासाठी चालू आर्थिक वर्षामध्ये विद्युत जनित्र (जनरेटर) खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय: -**

उप प्रादेशिक परिवहन कार्यालय, जळगाव या कार्यालयाकरिता GeM पोर्टलवरुन विद्युत जनित्र (जनरेटर) खरेदी करण्यास व त्यासाठी येणा-या रु. ७,७८,१६०/- (अक्षरी रुपये सात लक्ष अठ्याहत्तर हजार एकशे साठ फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरची खरेदी करताना उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि.०१.१२.२०१६ व दि.२४.०८.२०१७ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या खरेदीबाबतच्या अटी व शर्तीनुसार व GeM पोर्टलवरील अटी व शर्ती नुसार खरेदी प्रक्रियेची कार्यपद्धती अवलंबवावी.

३. यासाठी येणारा खर्च हा “मागणी क्र. बी-३, लेखाशीर्ष २०४१, वाहनांवरील कर (०१)(०७) साधनसामग्री खरेदी (२०४१ ०३३२), ५२ यंत्रसामग्री व साधनसामग्री” या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदरहू शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, मधील भाग- पहिला, उप विभाग- दोन मधील अनुक्रमांक४५, नियम क्रमांक १६९ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या पूर्ण अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२५१४२४२१०४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KADAM DATTATRAY HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032, street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2019.01.25 14:35:49 +05'30'

**(द.ह.कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव
४. महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई

७. प्रादेशिक परिवहन अधिकारी , धुळे
८. उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, जळगाव
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०.निवासी लेखा अधिकारी, मुंबई
११.अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवड नस्ती (परिवहन-४)